राजपत्रित अधिका-यांची वयाची ५०/५५ वर्षे पूर्ण झाल्यानंतर अथवा ३० वर्षांची अर्हताकारी सेवा पूर्ण झाल्यानंतर करावयाचे पुनर्विलोकन----
विशेष पुनर्विलोकन समित्या व अभिवेदन समित्यांनी केलेल्या शिफारशींवर निर्णय देण्याबाबत...

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक, क्र. एसआरसी-१०८९/प्रक्र. ३३/८९/१५,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक: १४ जानेवारी, १९९२.

संदर्भ:- शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसआरसी-१०८९/ प्र. क्र. ३३/८९/पंधरा, दिनांक १४. २. १९९०.

प रि प त्र क
==========

शासकीय विभागातील वर्ग १ व वर्ग २ च्या राजपत्रित अधिका-यांच्या वयाच्या ५०/५५ च्या वर्षी अथवा ३० वर्षांची अर्हताकारी सेवा पूर्ण झाल्यानंतर त्यांना सेवेत पुढे चालू ठेवण्याची पात्रापात्रता अजमाविण्यासाठी करावयाच्या पुनर्विलोकनाची प्रकरणे कोणत्या पुनर्विलोकन समितीला सादर करावी, व पुनर्विलोकन समितीच्या शिफारशींच्या आधारे घेतलेल्या निर्णयाबाबतचे अभिवेदन कोणत्या अभिवेदन समितीला सादर करावे तसेच सदर समित्यांच्या शिफारशींवर शासन निर्णय कोणत्या स्तरावर घेण्यात यावा इत्यादीबाबत संदर्भाधीन परिपत्रकान्वये आदेश देण्यात आले आहेत.

२. पुनर्विलोकन प्रकरणी विशेष पुनर्विलोकन समित्यांनी केलेल्या शिफारशींवर अंतिम शासन निर्णय कोणत्या स्तरावर घेण्यात यावा, याबाबत संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आदेशात बदल करून शासनाने आता असे सुधारित आदेश दिले आहेत की शासकीय विभागातील वर्ग १ व वर्ग २ च्या राजपत्रित अधिका-यांच्या पुनर्विलोकनाच्या प्रकरणी विशेष पुनर्विलोकन समित्यांनी व अभिवेदन समित्यांनी केलेल्या शिफारशी अंतिम निर्णयासाठी पुढील पृष्ठावर नमूद केलेल्या तक्त्यातील स्तंभ ४, ५ व स्तंभ ६ नुसार संबंधित मंत्री महोदयांना सादर करण्यात याव्यात.

| अधिकाऱ्यांचा वर्ग | विशेष पुनर्विलोकन समिती क्रमांक | अभिवेदन समिती | विशेष पुनर्विलोकन समित्यांच्या "अधिकाऱ्यांना सेवेत चालू ठेवण्याच्या" शिफारशी निर्णयासाठी कोणाला सादर कराव्यात. | विशेष पुनर्विलोकन समित्यांच्या "अधिकाऱ्यांना मुदतपूर्व सेवानिवृत्त करण्याच्या" शिफारशी निर्णयासाठी कोणाला सादर कराव्यात. | अभिवेदन समित्यांच्या शिफारशी, अंतिम निर्णयासाठी कोणाला सादर कराव्यात. |
|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. |
| वर्ग-२ | समिती क्र. २/३ | विशेष पुनर्विलोकन समिती क्र. १ | राज्यमंत्री | राज्यमंत्री | मंत्री + |
| वर्ग-१ | | | | | |
| १) वेतनश्रेणीचा किमान टप्पा रु. ३७००-पेक्षा कमी असलेले वर्ग १ चे अधिकारी. | समिती क्र. १ | आस्थापना मंडळ क्र. २ | मंत्री * | मंत्री + | मुख्यमंत्री |
| २) वेतनश्रेणीचा किमान टप्पा रु. ३७००- वा त्यापेक्षा अधिक परंतु रु. ५१००/-पेक्षा कमी असलेले वर्ग १ चे अधिकारी | समिती क्र. १ | आस्थापना मंडळ क्र. २ | मंत्री * | मुख्यमंत्री | मुख्यमंत्री |
| ३) वेतनश्रेणीचा किमान टप्पा रु. ५१०० किंवा त्याहून जास्त आहे अशी पदे धारण करणारे वर्ग १ चे अधिकारी. | समिती क्र. १ | आस्थापना मंडळ क्र. १ | मंत्री * | मुख्यमंत्री | मुख्यमंत्री |

* जे विभाग मुख्यमंत्र्यांच्या थेट नियंत्रणाखाली असतील अशा विभागाच्या अधिकाऱ्यांची प्रकरणे संबंधित राज्यमंत्र्यांचा सादर करण्यात यावीत.

\+ जे विभाग मुख्यमंत्र्यांच्या थेट नियंत्रणाखाली असतील अशा विभागांच्या अधिकाऱ्यांची, प्रकरणे मुख्यमंत्र्यांना सादर करण्यात यावीत.

. . . ३/-

3e1



सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, वर्ग १ च्या अधिकाऱ्यांची प्रकरणे पुनर्विलोकनासाठी सामान्य प्रशासन विभागाकडे पाठविताना अधिकाऱ्यांचा सुधारित वेतनश्रेणी न चुकता नमूद करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[अ. गे. मंडपे ]
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
मुख्य सचिव,
मंत्रालयीन विभागातील सर्व सचिव, प्रधान सचिव, अपर मुख्य सचिव,
विशेष पुनर्विलोकन समिती क्र. १, २ व ३ ह्यांचे सचिव.

*************